विशेष दुरुस्ती / विस्तार व सुधारणा अंतर्गत
घ्यावयाच्या कामांबाबत मागदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः प्रमा २०१३/ ( ७८५ /१३) / सिंव्य(कामे)**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**तारीख: ०१.०१.२०१५**

## परिपत्रक

जलसंपदा विभागातील पूर्ण झालेले प्रकल्प सिंचन व्यवस्थापन विभागाकडे हस्तांतरीत केले जातात. सदर हस्तांतर झालेल्या प्रकल्पांवर योजनेत्तर निधीतून नियमित देखभाल दुरुस्ती केली जाते. विशेष दुरुस्तीचे काम योजनेत्तर अनुदानातून पूर्ण करणे शक्य नसल्यास अशी कामे विशेष दुरुस्ती व विस्तार सुधारणा अंतर्गत घेतली जातात. अशा कामांना योजनेतंर्गत शासनामार्फत निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. प्राप्त परिस्थितीत प्रकल्पांची संख्या वयोमान व उपलब्ध निधी या बाबींचा विचार केल्यास विशेष दुरुस्ती , विस्तार व सुधारणा अंतर्गत समाविष्ट करावयाच्या कामांच्या प्रस्तावामध्ये सुसुत्रता यावी व प्रस्ताव सादरीकरणातील सध्याचा विस्कळीतपणा दूर व्हावा यासाठी सर्व समावेशक मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

विशेष दुरुस्ती, विस्तार व सुधारणा अंतर्गत करावयाच्या कामांचे नियोजन करतांना खालील मार्गदर्शक सूचना करण्यात येत आहेत. तरी त्यानुसार प्रस्ताव सादर करण्यात यावेत.

(१) विशेष दुरुस्ती / विस्तार व सुधारणा अंतर्गत घ्यावयाच्या कामांसाठी यापूर्वीचे शासन निर्णय व शासनाचे पत्र क्रमांक प्रमा २०१३/(७८५/१३) सिंव्य(कामे) दिनांक १०.६.२०१४ अन्वये निर्गमित केलेली तपासणी सुचीचा अंतर्भाव करुन प्रस्ताव महामंडळामार्फतच शासनास सादर करावेत.

(२) प्रत्येक महामंडळाने मागील ५ वर्षात महामंडळाकडे उपलब्ध करुन दिलेल्या सरासरी अनुदानाच्या दोन पटीच्या मर्यादेत विशेष दुरुस्तीचा वर्क प्लॅन तयार करावा. या वर्क प्लॅनमध्ये चालू कामासाठी लागणारा निधी विचारात घेऊन नवीन कामे अ.क्र. (१०) मधील सूचना विचारात घेऊन प्रस्तावित करावीत. सदर कामामुळे सिंचनात होणाऱ्या वाढीच्या आधारे लाभ:व्यय गुणोत्तर काढावे (Incremental benefit व Incremental Cost). ज्या प्रकरणी असे लाभ:व्यय गुणोत्तर काढणे शक्य नसेल तेथे याबाबतची सविस्तर कारणमिमांसा देऊन कामाच्या आवश्यकतेबाबत सविस्तर टिपणी द्यावी. प्रत्येक वर्षीच्या एप्रील ते जून या दरम्यान वरील सूचनांप्रमाणे अंदाजपत्रके शासनास मंजुरीसाठी सादर करावीत जेणेकरुन सप्टेंबर ते ऑक्टोबर या कालावधीत शासनस्तरावरुन प्रशासकीय मान्यता देण्यात येऊन हिवाळी अधिवेशनात सदर कामे अर्थसंकल्पित करता येतील.

(३) पूर्ण झालेल्या प्रकल्पांचे प्रकल्पनिहाय दुरुस्तीचे अंदाजपत्रक महामंडळाकडे तयार असावेत व वित्तीय वर्षाच्या आर्थिक मर्यादा विचारात घेवून प्राधान्यक्रम निश्चित करावा आणि त्यानुसार प्रस्ताव मंजुरीस्तव सादर करावेत.

(४) प्रकल्पावर आरआरआर, १३ वा वित्त आयोग, महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प व इतर स्त्रोतातून जी कामे हाती घेण्यांत आलेली असतील ती कामे वगळून उर्वरित कामे आवश्यकतेनुसार प्रस्तावित करावीत.

(५) कामे हाती घेतांना कालव्याच्या दुरुस्तीचे असे नियोजन करावे, जेणेकरुन दुरुस्तीनंतरची फलनिष्पत्ती तात्काळ दृष्टीस येईल.

(६) जे काम धरण सुरक्षितता संघटना नाशिक यांनी प्राधान्य क्रमाने करावे असे सूचविले आहे त्यांचा समावेश प्रथम प्राधान्याने अंदाजपत्रकामध्ये करावा.

(७) संकल्पीत सिंचन क्षमता व प्रत्यक्ष सिंचित क्षेत्र हयामधील तफावत दूर करण्यासाठी प्रणालीतील तृटी शोधून ती कामे प्रथम प्राधान्याने हाती घेण्यांत यावीत.

(८) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जलसंपत्ती विकास केंद्र औरंगाबाद यांच्या मार्फत प्रसिध्द होणा-या जललेखा व स्थिर चिन्हांकन अहवाल (Water Auditing & Bench Marking Report) यामध्ये प्रकल्पाचे ठळक घटक विचारात घेवून सदर घटकांबाबत निश्चित पातळी गाठण्यासाठी आवश्यक बाबींचा अंतर्भाव अंदाजपत्रकात करावा.

(९) विशेष दुरुस्तीचे अंदाजपत्रके सादर करतांना, ही कामे सुरु झाल्यापासून २ वर्षात पूर्ण होतील अशा प्रकारे नियोजन करावे व तेवढा वाव असलेल्या बाबीच अंदाजपत्रकात समाविष्ट कराव्यात .

(१०) विशेष दुरुस्ती प्रकल्प कोणते घ्यावेत, हयाचा निर्णय घेण्यासाठी खालील बाबींचा विचार करण्यात यावा.

अ) प्रकल्पाचे वयोमान.

ब) प्रकल्पाची निर्मित सिंचन क्षमता व मागील ५ वर्षात झालेले प्रत्यक्ष सिंचन याची टक्केवारी विचारात घेऊन कमी टक्केवारी असलेल्या प्रकल्पास प्रथम प्राधान्य,

क) पावसाळया पूर्व/उत्तर (Pre monsoon/Post monsoon Inspection) तपासणीत आढळलेल्या उणीवांचे प्रकार- वर्ग-१,२,३.

ड) धरण/वितरण प्रणालीची सदयस्थिती विचारात घेऊन ज्या ठिकाणी कालवा फुटण्याची शक्यता आहे किंवा बांधकामे दुरुस्ती न केल्यास पडण्याची शक्यता आहे अशी कामे

इ) ज्या वितरिका / लघु वितरिकांची वहन क्षमता कमी झाली आहे व पाणी उपलब्ध असूनही शेवटपर्यंत (Tail ) पोहचत नाही अशा प्रकरणी वहन क्षमता पुन:स्थापना कामे.

उ) उपलब्ध पाण्याचा कार्यक्षमतेने वापर करणेसाठी आवश्यक कामे उदा. नविन विमोचके, प्रवाह मापके,कालव्यातील गळती रोखणे इ. ,

ऊ) ज्या वितरण प्रणाली पाणी वापर संस्थाकडे हस्तांतरीत झालेल्या नाहीत व दुरुस्ती कामे करुन पाणी वापर संस्थेकडे हस्तांतरीत करणेसाठी आवश्यक कामे,

फ) लोकप्रतिनिधी व शेतकरी यांची निवेदने.

(११) प्रत्येक प्रकल्पावर हयापूर्वी झालेल्या दुरुस्तींची विस्तृत माहिती डॅक्युमेंटेड फॉर्मच्या (Printed Register- History sheet) स्वरुपात ठेवावी. जेणेकरुन त्याच कामाची पुनरावृत्ती होणार नाही.

(१२) झालेल्या कामांमुळे अपेक्षीत साध्य झाल्याबाबतच्या पडताळणीसाठी धरण / वितरण प्रणालीवर झालेल्या परिणामांचे सविस्तर लेखे (Performance Register) ठेवणे बंधनकारक करण्यांत येत आहे.

(१३) दरवर्षी विशेष दुरुस्ती/ विस्तार सुधारणाबाबत उपलब्ध करुन दिलेला निधी, केलेली कामे, सिंचनात झालेली वाढ, पाणी वापराच्या कार्यक्षमतेत झालेली वाढ याबाबतचा अहवाल मुख्य अभियंता यांनी शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१०५१२५९१४८३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2015.01.05 13:13:00 +05'30'

**(सं. अ. टाटू)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१.सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
२. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
३.सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
४. सिंव्य(कामे)/कार्यासन संग्रहार्थ.